**क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले बालसंगोपन योजनेंतर्गत DBT तत्वाद्वारे लाभार्थ्यांना अनुदान वितरीत करण्यासाठी ॲक्सिस बँकेची सेवा घेण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन पूरकपत्र क्रमांक- बालसं-२०२३/प्र.क्र.२२१/का-८**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १२ जून, २०२४

**वाचा :-**

१. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.बालसं-२०२२/प्र.क्र.९२/का-८ दि.३०/०५/२०२३
२. मा.सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील दि.०१.०२.२०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त क्र.बालसं-२०२३/प्र.क्र.२२१/का-८ दि.१३.०२.२०२४
३. शासन निर्णय समक्रमांक दि.१३.०२.२०२४
४. वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.८८/२३/कोषा-प्रशा ५ दि.०३.१०.२०२३

**शासन पूरकपत्र :-**

क्रांतिज्योति सावित्रीबाई फुले बालसंगोपन योजनेंतर्गत राज्यातील सर्व पात्र लाभार्थी व संस्थांचे अनुदान, DBT प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या खात्यात व संस्थेच्या खात्यात थेट लाभ वितरीत करण्यासाठी ॲक्सिस बँकेची सेवा घेण्याचा निर्णय वाचा क्र.३ अन्वये घेण्यात आला आहे. सदर निर्णयास वित्त विभागाच्या व्यय कार्यासन अनौसं.क्र.११४/व्यय-६/दि.२५.०४.२०२४ आणि कोषा कार्यासन अनौसं.क्र.११२/२०२४/ को.प्र.५ दि.०२.०५.२०२४ अन्वये कार्योत्तर मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. या योजनेंतर्गत वितरीत होणाऱ्या निधीच्या प्रत्यक्ष विनियोगासाठी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम २८२ आणि मुंबई वित्तीय नियिम, १९५९ मधील नियम ५७ अन्वये विहित करण्यात आलेल्या ***त्वरीत संवितरणासाठी आवश्यकता असल्याखेरीज शासकीय लेख्यातून रक्कम काढण्यात येणार नाही*** आणि ***मागण्यांच्या अपेक्षेने किंवा अर्थसंकल्पीय अनुदाने व्यपगत होण्यास प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने कोणतीही रक्कम काढणे***

***अनुज्ञेय नाही*** या तरतूदींचा भंग होणार नाही याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. नवीन बँक खाते उघडणे आणि त्याचे व्यवस्थापन आणि इतर अनुषांगिक बाबींच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या वाचा क्र.४ येथील शासन निर्णयातील नमूद तरतूदींचे पालन करणे बंधनकारक आहे.

५. या योजनेसाठी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात येणारे नोडल अकांऊट हे Flexi Saving Account या प्रकारचे असणे आवश्यक आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०६०६१६४२२३१६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILESH
JANARDAN
PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2024.06.12 16:53:46 +05'30'

( डॉ.निलेश ज.पाटील )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
५. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
८. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
९. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१०.सर्व उपसचिव/ अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११.उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१३.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का-१४७२), मंत्रालय, मुंबई
१४.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.वरीष्ठ उपाध्यक्ष तथा राज्य प्रमुख- पश्चिम १, गव्हर्नमेंट कव्हरेज ग्रुप, ॲक्सिस बँक लिमीटेड, २रा मजला, कॉर्पोरेट पार्क, सायन-ट्रॉम्बे रोड, मुंबई ४०००७१
१६. निवड नस्ती, का-०८.